**मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांना दिलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स येथील भूखंडाच्या भाडेपट्ट्याचे नुतनीकरण करण्यास, तसेच, उर्वरित भूखंडावर आंतरराष्ट्रीय दर्जाचे सेंट्रल पब्लिक पार्क विकसित करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-बीएमसी-२५२४/प्र.क्र.८१(भाग-२)/नवि-२१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४.

**संदर्भ:-**
१. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.जमीन-२५१२/०८/प्र.क्र.५१/ज-२, दिनांक २३.०६.२०१७
३. शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्र. बीएमसी-२५१६/प्र.क्र.२८०/नवि-२१, दि.१५.०३.२०१७.
४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांचे क्र.एमजीसी/ए/३२२९,दि.२६.०२.२०२४ रोजीचे पत्र.
५. शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्र.बीएमसी-२५२४/प्र.क्र.८१(भाग-१)/नवि-२१, दि.१४.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या अनुसूची “डब्ल्यू”मध्ये नमूद केलेल्या मालमत्ता शासनाच्या असून या मालमत्ता, बृहन्मुंबई महानगरपालिकेस सुपूर्द (vest) केल्या आहेत. या मालमत्ता बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत विविध कालावधीकरीता मक्त्याने देण्यात येतात. मक्ता कालावधी संपुष्टात आल्यानंतर या मालमत्तांची मालकी आपोआप शासनाकडे येते. त्यामुळे, या मालमत्तांच्या मक्त्यांच्या नुतनीकरणाबाबतचे धोरण शासनामार्फत निश्चित होणे आवश्यक आहे. त्यानुसार, मंत्रिमंडळाच्या मान्यतेनंतर अनुसूची “डब्ल्यू” मधील मालमत्तांच्या नुतनीकरणाबाबत संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय, नगरविकास विभाग दि.१५.०३.२०१७ अन्वये धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. सदर धोरणात महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभाग या मालमत्तांचे नुतनीकरण हे शासनाच्या मान्यतेने करण्यात येईल, तसेच, नुतनीकरण करण्यासाठी भाडेपट्टयाच्या रकमेचे दर, त्याची आकारणी, परिगणना याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येतील, असे नमूद केले आहे.

**०२.** यास्तव,मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भूभाग क्र.१ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर भूखंडापैकी ९१ एकर इतक्या भूखंडाच्या भाडेपट्ट्याचे नुतनीकरण करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी संदर्भ क्र.४ येथील दि. २६.०२.२०२४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. यास्तव,मे. रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांना दिलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स येथील भूखंडाच्या भाडेपट्ट्याचे नुतनीकरण करण्याची, तसेच, उर्वरित भूखंडावर आंतरराष्ट्रीय दर्जाचे सेंट्रल पब्लिक पार्क विकसित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी संदर्भ क्र. ४ येथील दि.२६.०२.२०२४ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने दि.११.०३.२०२४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीतील प्राप्त मंजूरीस अनुसरुन मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भूभाग क्र.१ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर भूखंडापैकी **९१ एकर इतक्या भूखंडाच्या भाडेपट्ट्याचे नुतनीकरण** करण्यास मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ९१ब(२) मधील तरतूदीनुसार,तसेच, अनुक्रमे संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दि. २३.०६.२०१७ आणि शासन निर्णय, नगर विकास विभाग, दि.१५.०३.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदींनुसार खाली नमूद **अटी व शर्तींच्या** अधीन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१. भूभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर इतक्या भूखंडापैकी १२० एकर इतका भूखंड मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांच्याकडून बृहन्मुंबई महानगरपालिकेने ताब्यात घ्यावा.
२. भूभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील सदरहु १२० एकर इतक्या भूखंडावर न्युयॉर्क, अमेरिका, तसेच, लंडन, इंग्लंड येथील सेंट्रल पार्कच्या धर्तीवर महालक्ष्मी रेसकोर्स येथे बृहन्मुंबई महानगरपालिकेद्वारे आंतरराष्ट्रीय दर्जाचे सेंट्रल पब्लिक पार्क विकसित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
३. त्यानुषंगाने सदर नियोजित सेंट्रल पब्लिक पार्क बाबतचाविस्तृत आराखडा बृहन्मुंबई महानगरपालिकेने मान्यतेस्तव शासनास सादर करावा. तसेच, यासंदर्भात यापुढे संबंधित आराखड्यामध्ये वेळोवेळी करण्यातयावयाच्या बदलाच्या संदर्भातील प्रस्ताव अंतिम मान्यतेस्तव शासनास वेळोवेळी सादर करण्याबाबतची दक्षता बृहन्मुंबई महानगरपालिकेने घ्यावी.
४. सदरहु आंतरराष्ट्रीय दर्जाचे सेंट्रल पब्लिक पार्क विकसित करण्यासाठी येणारा सर्व खर्च व तद्नुषंगिक इतर सर्व खर्च हा बृहन्मुंबई महानगरपालिकेने करावा.
५. मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांना महालक्ष्मी रेसकोर्स येथे भाडेपट्ट्याने दिलेल्या भूखंडावरील करार संपुष्टात आल्याच्या दिनांकापासून म्हणजेच, दि.०१ जून,२०१३पासून ते सदर भूभागाचा बृहन्मुंबई महानगरपालिकेने प्रत्यक्षात ताबा घेण्याच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीसाठीच्या भाडेपट्ट्याकरिता अनुज्ञेय होणाऱ्या रकमेच्या फरकाची रक्कम ही संदर्भ क्र.२ व ५ येथील, अनुक्रमे, शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.२३ जून,२०१७ व शासन निर्णय, नगरविकास विभाग दि.१४ मार्च,२०२४ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदींन्वये निश्चित करण्यात आलेल्या दरांनुसार, मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांचेकडून बृहन्मुंबई महानगरपालिकेद्वारे वसूल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
६. मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांना भूभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथे भाडेपट्ट्याने दिलेल्या एकूण २११ एकर इतक्यासंपुर्ण जागेच्या भूखंडावरील करार संपुष्टात आल्याच्या दिनांकापासून म्हणजेच, दि.०१ जून,२०१३ पासून ते सदर भूभागाचा बृहन्मुंबई महानगरपालिकेने प्रत्यक्षात ताबा घेण्याच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीकरिता भाडेपट्ट्याचे नुतनीकरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. तसेच,भूभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर इतक्या संपुर्ण जागेचा वापर हा संबंधित भाडेपट्ट्याचे नुतनीकरण करण्याच्या दिनांकापर्यंत मे. रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब यांचेद्वारे करण्यात येणार आहे.

त्यामुळे,सदर भाडेपट्ट्याचा करार संपुष्टात आल्याच्या दिनांकापासून म्हणजेच, दि.०१ जून, २०१३ ते सदर कालावधीसाठी भूभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर इतक्या संपुर्ण क्षेत्राच्या भाडेपट्ट्याच्या कराराचे नूतनीकरण करण्याच्या दिनांकापर्यंत अनुज्ञेय होणाऱ्या भाडेपट्टयाच्या रकमेची आकारणी करण्यात यावी व अनुषंगिक फरकाची रक्कम, वर नमुद केल्याप्रमाणे, मे. रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेकडून बृहन्मुंबई महानगरपालिकेने वसुल करावी.

८. भूभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर भूखंडापैकी ९१ एकर इतका भूखंड मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना,सदर भूभागाचा प्रत्यक्षात ताबा देण्याच्या दिनांकापासून ते पुढील ३० वर्षाच्या महत्तम कालावधीसाठी भाडेपट्ट्याने देण्याच्या अनुषंगाने सदर भाडेपट्ट्याचे नुतनीकरण हे वेळोवेळी विहित करण्यात आलेल्या तरतूदीनुसार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

९. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर इतक्या भूखंडापैकी १२० एकर व ९१ एकर इतक्या भूखंडाचे विहित नियमानुसार सिमांकन व अनुषंगिक मूल्यांकन करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचेद्वारे तातडीने करण्यास मान्यता देण्यात येत आहे.तसेच, या अनुषंगाने अनुज्ञेय होणाऱ्या शुल्काचा शासनाकडे भरणा करण्यासंदर्भातील अनुषंगिक कार्यवाही विहित नियमानुसार बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी करावी.

१०. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील **मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लबच्या** व्यवस्थापकीय समितीवर आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका हे पदसिध्द सभासद राहतील.

११. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील **मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांच्या उक्त भाडेपट्टाकराराचे प्रथम नुतनीकरण करतांना /नवीन मक्ता करार करतांना मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि.मध्ये ५० आजीवन (निःशुल्क) सदस्य नामनिर्देशीत करण्याचा अधिकार मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांना असेल.**

१२. तसेच,भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील **मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लबलि. मध्येप्रत्येक वर्षी ३ आजीवन (निःशुल्क) सदस्य नामनिर्देशीत करण्याचा अधिकार मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांना असेल.**

१३. **मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. च्या एकूण सभासद संख्येच्या ५% इतके सभासद** केंद्र शासनाच्या /राज्य शासनाच्या/बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या सेवेत कार्यरत असलेल्या **"अ" वर्ग** अधिकाऱ्यांमधून **"सर्व्हिस मेंबर्स" म्हणून नगर विकास विभाग (कार्यासन नवि- २१ /** बृहन्मुंबई महानगरपालिका**)**, मंत्रालय, मुंबई यांच्या मान्यतेने घेणे **मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेवर बंधनकारक राहील**.

संबंधित अधिकारी यांचे अशाप्रकारचे सदस्यत्व हे सदरहू अधिकारी **मुंबई शहर जिल्ह्यात** संबंधित आस्थापनेवर नियुक्त असतानाच्या कालावधीसाठी असेल. तसेच, **"सर्व्हिस मेंबर्स"** यांचे सदरहु सदस्यत्व हे **निःशुल्क** असेल.

१४. प्रधान सचिव (नवि-१) व प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,आणि आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका हे मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. या क्लबचे आजीवन (निःशुल्क) सदस्य असतील. मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. मध्ये प्रत्येक वर्षी १ आजीवन

(निःशुल्क) सदस्य नामनिर्देशीत करण्याबाबतचा अधिकार प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना असेल.

१५. महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम क्लब यांच्याशी संबंधित कामकाजाचे प्रभावीपणे समन्वय साधण्याकरिता सदर महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. याक्लबमध्ये त्याचप्रमाणे विविध जिमखाने व तत्सम क्लबमध्ये प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई व उप सचिव (नवि-२१/बृहन्मुंबई महानगरपालिका कार्यासन), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे पदसिध्द सदस्य असतील व त्यांनी यासंदर्भात वेळोवेळी प्राधिकृत केलेले सक्षम प्राधिकारी हे मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. याक्लबमध्ये त्याचप्रमाणे विविध जिमखाने व तत्सम क्लबमध्ये अनुषंगिक बैठकांना उपस्थित राहण्यास पात्र राहतील.

१६. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांच्या भाडेपट्टा कराराच्या अनुषंगाने बृहन्मुंबई महानगरपालिका तसेच मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांच्यामध्ये होणाऱ्या भाडेपट्टा करारामध्ये नमूद सर्व अटी व शर्तींची काटेकोरपणे व प्रभावीपणे आणि तत्परतेने अंमलबजावणी करण्याबाबतची दक्षता बृहन्मुंबई महानगरपालिका, तसेच,मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांनी न चुकता घ्यावी. तसेच,या शासन निर्णयात नमूद सर्वअटी व शर्तींचा, तसेच, भाडेपट्टा करारामधील तरतूदींचा कोणत्याही प्रकारचा भंग झाल्यास त्यासंदर्भात विहित धोरणानुसार/तरतुदीनुसार आवश्यक ती पुढील कारवाई शासनाद्वारे करण्यात येईल.

१७. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्ट्यावर देण्यात येणाऱ्या जागेवर असलेले कोणतेही बांधकाम किंवा बांधकामासहित सदर जागा किंवा त्या जागेचा कोणताही भाग हा मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना कोणालाही परस्पर विकता येणार नाही, किंवा, हस्तांतरीत करता येणार नाही. याबाबतची दक्षता व खबरदारी बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी वेळोवेळी घ्यावी.

१८. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्ट्यावर द्यावयाच्या भूखंडाच्या मक्त्याचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर किंवा त्यापूर्वीच सदर मक्ता संपुष्टात आणण्यात आला तर, बृहन्मुंबई महानगरपालिकेला संबंधित भूखंडाचा ताबा हस्तांतरीत करतांना सदर जागेवर असलेली बांधकामे, कायम स्वरुपाच्या बाबी, जोडकामे आणि जमिनीच्या विकासासाठी केलेल्या खर्चाबाबतचा मोबदला मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना बृहन्मुंबई महानगरपालिकेला किंवा राज्य शासन यांच्याकडे मागता येणार नाही.

१९. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्ट्यावर दिलेल्या भूखंडाचा ताबा बृहन्मुंबई महापालिकेला देण्यापूर्वी त्या भूखंडावर असलेली बांधकामे, कायम स्वरुपाची बांधकामे आणि जोडकामे हलविण्याचा अधिकार मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना राहील. परंतु,सदर बांधकामे आणि जोडकामे पाडून टाकण्यासाठीची किंमत भरुन ती बांधकामे कायम स्वरुपाची बांधकामे व इतर बाबी, जोडकामे इत्यादी विकत घेण्याची मुभा बृहन्मुंबई महानगरपालिकेला राहील. तथापि, या संदर्भात कोणतेही मतभेद उद्भवल्यास सदर बांधकामे व इतर संबंधित बाबींचे सर्वेक्षण करुन सदर बांधकामे निष्काषित करण्यासाठी /पाडून टाकण्यासाठी अनुज्ञेय होणारी रक्कम प्रचलित कार्यपध्दतीनुसार निश्चित करुन त्यासंदर्भातील आवश्यक ती पुढील कार्यवाही विहित नियमानुसार बृहन्मुंबई महानगरपालिका यांचेद्वारे करण्यात येईल.

२०. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्ट्यावर दिलेल्या भूखंडाच्या भूभागामधून जाणारी गटारे, मलनिःसारण व्यवस्था आणि प्रमुख जलवाहिन्या इत्यादीची साफसफाई किंवा दुरुस्ती अथवा सदर बाबींचे नूतनीकरण करण्याच्या

अनुषंगाने सदर भूभागावर बृहन्मुंबई महानगरपालिकेला वेळोवेळी प्रवेश आणि आवश्यक त्या सर्व सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबतचे बंधन व त्यासंदर्भातील अनुषंगिक सर्व जबाबदारी ही मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेवर राहील.

२१. मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेद्वारे अश्व शर्यतीसाठी आणि अश्व प्रशिक्षणाकरीता वापरावयाच्या भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील धावपट्ट्या, इमारती आणि बंदिस्त जागा यांनी न व्यापलेली जागा ही संबंधित अश्व शर्यतीचे दिवस वगळून उर्वरित कालावधीकरिता संपूर्ण वर्षभर,बृहन्मुंबई महानगरपालिकेसोबत झालेल्या भाडेपट्टा करारामध्ये विवक्षितपणे नमूद,चालणे तसेच धावणे इ. उद्देशासाठी जनतेकरिता खुली ठेवणे मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेवर बंधनकारक राहील.

२२. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील भूखंडाच्या अनुषंगाने मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेसोबत बृहन्मुंबई महानगरपालिकेद्वारे करण्यात येणाऱ्या मक्त्याच्या करारानाम्यासाठी अनुज्ञेय असलेला खर्च व तद्नुषंगिक इतर सर्व खर्च करण्यासंदर्भातील जबाबदारी मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांच्यावर राहील.

२३. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील भूखंडाचे सिमांकन करण्यासाठी अनुज्ञेय होणाऱ्या मोजणी शुल्काची रक्कमही भाडेपट्टाकरारातील तरतूदीनुसार व विहीत नियमानुसार जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचेकडे भरणा करण्यासंदर्भातील दक्षता मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. व बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी घ्यावी.

२४. त्याचप्रमाणे, भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील भूखंडाच्या भाडेपट्ट्याचे नुतनीकरण करण्यासाठी अनुज्ञेय होणाऱ्या मुद्रांक शुल्काची रक्कमही भाडेपट्टाकरारातील तरतूदीनुसार व विहीत नियमानुसार भरणा करण्यासंदर्भातील दक्षता मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. व बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी घ्यावी.

२५. जनतेच्या हिताच्या अनुषंगाने दरवर्षी पावसाळा संपल्यानंतर लगतच्या कालावधीत चालण्याचे/धावण्याचे मार्ग तातडीने पूर्ववत करण्याची त्याचप्रमाणे सदरहु चालण्याचे / धावण्याचे मार्ग वर्षभर सुस्थितीमध्ये राहतील याची जबाबदारी मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांच्यावर राहील.

२६. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेद्वारे आयोजित करण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमांच्या तसेच अन्य कार्यक्रमांच्या अनुषंगाने होणारे ध्वनी प्रदूषण हे विहित नियमानुसार अनुज्ञेय असलेल्या मर्यादेतच ठेवणे बंधनकारक आहे.

२७. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेद्वारे आयोजित करण्यात येणाऱ्या अश्व शर्यती झाल्यानंतर धुळीचा उपद्रव होऊ नये म्हणून धावावयाच्या मार्गाला लागून असलेल्या घोड्यांच्या रपेटीच्या मार्गावर विशेषतः दररोज सकाळी आणि संध्याकाळी व आवश्यकतेप्रमाणे पाणी शिंपडण्याची जबाबदारी मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेवर राहील.

२८. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेद्वारे संपूर्ण वर्षभरात आयोजित करण्यात येणाऱ्या अश्वशर्यतीच्या कालावधीमधील एक दिवसाच्या अश्वशर्यतीचे उत्पन्न हे मतिमंद तसेच मुक्या आणि बहिऱ्या व्यक्ती / दिव्यांग व्यक्तींसाठी शाळा चालविण्याकरिता त्याचप्रमाणे कर्करोग रुग्णालय बांधण्यासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेस सहाय्य म्हणून "महापौर निधी" मध्ये देणे मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेवर बंधनकारक व अनिवार्य असेल.

२९. भुभाग क्र. १ जे, महालक्ष्मी रेसकोर्स येथील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्ट्यावर द्यावयाच्या जागेवर मे. रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेद्वारे देण्यात येणाऱ्या

विविध कार्यक्रमांसंदर्भातील महसूल वसूली बाबतचा,सदर भूखंडाबाबत उद्भवणाऱ्या विविध समस्यांबाबतचा, तसेच, अनुषंगिक बाबींसंदर्भातील आढावा प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या स्तरावर प्रत्येक तीन महिन्यांच्या कालावधीत घेण्यात येईल व सदर आढावा बैठकीस आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका अथवा त्यांचेद्वारे प्राधिकृत सक्षम प्राधिकारी उपस्थित राहतील.

३०. संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णय, नगर विकास विभाग दि.१४.०३.२०२४ मध्ये नमूद सर्व अटी व शर्तींची पुर्तता काटेकोरपणे करणे बंधनकारक राहील.

**०२.** सदर शासन निर्णय, महसूल व वन विभाग, वित्त विभाग आणि विधी व न्याय विभाग यांनी दिलेल्या अभिप्रायानुसार, तसेच,दि.११.०३.२०२४ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१११५०४२५१५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GOVINDARAJ KORAMANNA
HIRANYA GOWDA

Digitally signed by GOVINDARAJ KORAMANNA HIRANYA GOWDA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=10a32fa5e4e3aa5a8332798cc4e6ba14f319051955769f69e69187ed22d67f03,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4B6A32EE2B0D37280E72D06B8D130B85460D5AD93BDAC010E0B42FDCCD8715E6, cn=GOVINDARAJ KORAMANNA HIRANYA GOWDA
Date: 2024.03.14 15:22:53 +05'30'

**( डॉ.के.एच.गोविंदराज )**
**प्रधान सचिव (नगर विकास-२)**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव. राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. सभापती, विधान परिषद/ मा. अध्यक्ष, विधानसभा,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा.
५. मा. सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य
६. मा. मुख्य सचिवांचे सह सचिव.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), महाराष्ट्र -२ नागपूर.
९. मा. महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१०. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
११. मुंबई महानगर प्रदेश क्षेत्रातील सर्व महानगरपालिका आयुक्त.
१२. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर व प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१४. जिल्हाधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगरे जिल्हा.
१५. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, नगर विकास मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती(कार्या-नवि-२१)